“भारतरत्न डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार” विस्तारीत योजना व टप्पा-२ च्या अंमलबजावणीकरिता निधी वितरीत करण्याबाबत.
**( लेखाशिर्ष. २२३६ १७८५ )**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः बीयुडी-२०१६ / प्र. क्र. ०८ / कार्या - ०६.**
मंत्रालय विस्तार, मुंबई-४०० ०३२
तारीख: - ०३ मार्च, २०१७.

वाचा -

१) वि. वि. शासन परिपत्रक क्र.अर्थसं- २०१६ / प्र. क्र.८९ / अर्थ-३, दि.२०.०४.२०१६.
२) वि. वि, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६.
३) वि. वि, शासन परिपत्रक क्र. पूरक - २०१६ /प्र.क्र.१२८/ अर्थसंकल्प-३, दि.१२.८.२०१६.
४) आ.वि.वि. शासन निर्णय क्र. आविवि-२०१५/ प्र.क्र.७८/कार्या-०८, दि. १८-११-२०१५.
५) आदिवासी विकास विभाग नस्ती क्र. आविवि- २०१६/ प्र.क्र. १०७ /कार्या- ०८.

**शासन निर्णय :-**

अनुसूचित क्षेत्रातील कुपोषणाचे प्रमाण कमी करण्यासाठी गरोदर स्त्रिया व स्तनदा मातांना एक वेळ चौरस आहार देण्याकरिता “भारतरत्न डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार” योजना राबविण्याचा निर्णय शासनाच्या वाचा क्र.४ येथील शासन निर्णयान्वये घेण्यात आला. सदर योजनेच्या विस्तारासाठी तसेच टप्पा क्र. २ च्या अंमलबजावणीसाठी रु. ४९८५.३५ लाख इतक्या पुरवणी मागणीस मंजूरी प्राप्त झालेली आहे.

वित्त विभागाने पुरवणी मागणीस दिलेल्या मंजूरीस अधीर राहून मागणी क्र. टी-५, २२३६, पोषण आहार, पंचवार्षिक योजनांतर्गत योजना, ०२, पोषक अन्न व पेये वितरण, ७९६, जनजाति क्षेत्र उपयोजना, (०१) जनजाति क्षेत्र उपयोजनांतर्गत योजना (०१) (०७) भारतरत्न डॉ. ए.पी.जे. अब्दुल कलाम अमृत आहार योजना (२२३६ १७८५ ), ३१- सहायक अनुदाने (वेतनेत्तर) या लेखाशिर्षाखाली पुरवणी मागणीच्या मंजूर निधीच्या ८० % च्या प्रमाणात **रु.३९८८.२८ लाख** ( अक्षरी रुपये एकोणचाळीस कोटी अठ्ठयाऐंशी लाख अठ्ठावीस हजार फक्त ) इतकी रक्कम अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर वितरित करण्यास शासन मान्यता प्रदान करण्यात येत आहे.

२. **उपरोक्त वितरीत केलेला निधी या प्रकल्पाच्या मंजूर प्रशासकीय मान्यता रकमेच्या मर्यादेत करण्याची तसेच त्यानुषंगाने निधी खर्च करण्यासंबंधीच्या नियमांचे पालन करण्याची दक्षता नियंत्रक अधिकारी यांनी घ्यावी.**

३. सदर वितरीत निधी अर्थसंकल्पिय वितरण प्रणालीवर (BEAMS) खर्चासाठी नियंत्रक अधिकारी, आयुक्त, एकात्मिक बालविकास योजना यांना सुपूर्द करण्यात येत आहे. नियंत्रक अधिकारी यांनी वितरित निधीच्या मर्यादेत व वित्त विभागाच्या शासन परिपत्रक क्र. अर्थसं- २०१६ / प्र. क्र.८९ / अर्थ-३, दि.२०.०४.२०१६. व वित्त विभाग, शासन परिपत्रक क्र. संकीर्ण- २०१६/प्र.क्र.३१/कोषा.प्रशा-५, दि.१०.५.२०१६ मधील अटी व शर्तींची पुर्तता करण्याची दक्षता घ्यावी.

४. सदर शासनादेश वित्त विभागाच्या अनौ.संदर्भ क्रमांक ३०/व्यय-१४ , दि. ०७ /०२ /२०१७ तसेच अनौ. संदर्भ क्र. ३३ /अर्थ-१९, दि.२१-०२-२०१७ अन्वये प्राप्त सहमतीने निर्गमित करण्यात येत आहे.

५. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१७०३०३१२१०२५२१२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नांवाने,

Bhagwan Maruti Sawant

Digitally signed by Bhagwan Maruti Sawant
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Section Officer, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Bhagwan Maruti Sawant
Date: 2017.03.03 14:39:45 +05'30'

**भगवान सावंत**
अवर सचिव.

**प्रत,**

१. अपर मुख्य सचिव, महिला व बाल विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
२. आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
३. आयुक्त, आदिवासी संशोधन व प्रशिक्षण संस्था, पुणे.
४. आयुक्त, कुटूंब कल्याण, मंत्रालय, मुंबई.
५. आयुक्त, एकात्मिक बाल विकास योजना, सी.बी.डी. बेलापूर, नवी मुंबई.
६. संचालक, सार्वजनिक आरोग्य संचालनालय, मुंबई.
७. सर्व अपर आयुक्त, आदिवासी विकास विभाग.
८. सर्व प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प.
९. सर्व जिल्हा आरोग्य अधिकारी, जिल्हा परिषदा.
१०. महालेखापाल (लेखापरिक्षा)/(लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र १/२, मुंबई/नागपूर.
११. अधिदान व लेखाधिकारी,मुंबई.
१२. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई.
१३. वित्त विभाग / नियोजन विभाग, मंत्रालय, मुंबई-४०० ०३२.
१४. कक्ष अधिकारी, कार्यासन-०८, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
१५. निवड नस्ती (का.६), आदिवासी विकास विभाग.